**महिला व बाल विकास विभागाच्या जाहिरात व प्रसिध्दी बाबतची देयके अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२३/प्र.क्र.१२३/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : -१४ मार्च,२०२४

संदर्भ :- १) महिला व बाल विकास विभाग शा.नि.क्र. एबावि-२०२३/प्र.क्र.१०७/का.६, दि.१८.०४.२०२३.
२) महिला व बाल विकास विभाग शा.नि.क्र. एबावि-२०२३/प्र.क्र.३४७/का.६, दि.०५.०२.२०२४.
३) महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. मबाविआ/जाहिरात अनुदान/२०२३-२०२४/का.६/६७१८, दि. २३.११.२०२३

शासन निर्णय :-

महिला व बाल विकास विभागामार्फ़त राबविण्यात येणा-या विविध योजना, कायदे / नियम इ. ची जनजागृती / प्रसिध्दी करण्याच्या अनुषंगाने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फ़त माध्यम आराखडा राबविण्यास संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार जाहिरात प्रसिध्दीकरिता रुपये २,०८,००,००० /- (अक्षरी रुपये दोन कोटी आठ लक्ष फ़क्त) तसेच प्रलंबित असलेली देयके अदा करण्याकरिता रुपये १,००,००,००० /- (अक्षरी रुपये एक कोटी फ़क्त) असा एकूण रुपये ३,०८,००,००० (अक्षरी रुपये तीन कोटी आठ लाख फ़क्त ) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी प्रसिध्दीचे कामकाज विहित केल्याप्रमाणे पूर्ण झाल्याची खातरजमा करून संबंधितांची देयके अदा करण्याची कार्यवाही आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी.

३. उपरोक्त खर्च करताना यासंदर्भातील शासनाचे निर्णय / आदेश / परिपत्रक / वित्तीय नियमावलीतील तरतुदी / नियमावली इत्यादींचे पालन तसेच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास,महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. उपरोक्तप्रमाणे नमूद केलेला निधी हा सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. एक्स-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२- समाज कल्याण, ००१- संचालन व प्रशासन, (०१) महिला व बाल कल्याण संचालनालय, (०१) (०५) जनजागृती, प्रसिध्दी, प्रशिक्षण आणि मूल्यमापन (कार्यक्रम), २२३५ ए ९०१, २६- जाहिरात व प्रसिध्दी या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करून देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६९/का.१४७२, दिनांक १५.०२.२०२४ तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक- ५०/व्यय-६, दिनांक ०६.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१६१२५७८६३० आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.03.20 11:35:14 +05'30'

**(वि. रा. ठाकूर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
२) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२) / वित्त विभाग (व्यय-६, अर्थ-७), मंत्रालय, मुंबई
९) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग यांना कळविण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करावा.
१०) निवड नस्ती -का-६.